**माननीय सर्वोच्च न्यायालयाने सिव्हिल अपिल क्र. ८९२८/२०१५ व इतर याचिका यामध्ये दिनांक ०६ जुलै, २०१७ रोजी दिलेल्या निर्णयाची राज्यात अंमलबजावणी करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-न्यायाप्र-२०१९/प्र.क्र.११०/१९/प्रशा-५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक: २९ जून, २०२०

**संदर्भ :-**

१) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्रमांक- बीसीसी२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब दिनांक २१ डिसेंबर, २०१९
२) या विभागाचे समक्रमांकाचा शासन निर्णय, दिनांक ०४ जानेवारी, २०२०
३) या विभागाचे समक्रमांकाचे शासन शुध्दीपत्रक दिनांक १५ जानेवारी, २०२०
४) या विभागाचे समक्रमांकाचे शासन शुध्दीपत्रक दिनांक ३१ जानेवारी, २०२०
५) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे, यांचे पत्र क्र.संकीर्ण२०१९/आस्था-ब(१२३)/७७, दिनांक ०६ जानेवारी, २०२०

**प्रस्तावना :-**

सामान्य प्रशासन विभागाने दिनांक २१ डिसेंबर, २०१९ च्या शासन निर्णयानुसार मा. सर्वोच्य न्यायालयाने सिव्हिल अपिल क्र. ८९२८/२०१५ व इतर याचिका यामध्ये दिनांक ०६ जुलै,२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाची राज्यात अंमलबजावणी करण्याच्या सूचनानुसार शासन निर्णयामधील अ.क्र.१ येथे नमूद केलेल्या कारणास्तव जात वैधता प्रमाणपत्र अवैध ठविलेल्या कर्मचाऱ्यांकरिता अधिसंख्य पद निर्माण करण्याकरिता कर्मचाऱ्यांची संवर्गनिहाय संख्या निश्चित करुन त्यांच्या सेवा दि. ३१.१२.२०१९ पर्यंत अधिसंख्य पदांवर वर्ग कराव्यात अशा सूचना दिल्या आहेत. त्यानुसार आयुक्त शिक्षण यांच्याकडून प्राप्त झालेल्या अहवालानुसार विभागाने दिनांक ४.१.२०२० च्या शासन निर्णयान्वये १४ अधिसंख्य पदे निर्माण केली आहेत. त्यापैकी श्री. रमेश महादेव राऊत, कनिष्ठ लिपीक, विभागीय शिक्षण उपसंचालक, नागपूर यांनी मा. उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर येथे जात पडताळणी समितीने दिलेल्या निर्णयास आव्हान दिलेले असून सदर याचिकेवर मा. उच्च न्यायालयाने Status-quo दिलेला असल्याने श्री. रमेश महादेव राऊत यांचे नाव विभागाच्या दि. १५.१.२०२० च्या शुध्दीपत्रकान्वये वगळण्यात आले आहे. तसेच कोल्हापूर विभागातील श्री. बी. आर. कोळी, वरिष्ठ लिपिक व श्री. व्ही.एस.गुरव, कनिष्ठ लिपीक यांचे पदनाम चुकीचे असल्याकारणाने श्री. बी.आर.कोळी, मुख्य लिपीक व श्री. व्ही.एस. गुरव, वरिष्ठ लिपीक असे वाचण्यात यावे असे दि. ३१.१.२०२० रोजी शुध्दीपत्रक निर्गमित करण्यात आले आहे. आता उर्वरित कर्मचाऱ्यांकरिता अधिसंख्य पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :**

मा. सर्वोच्च न्यायालयाने सिव्हिल अपिल क्र.८९२८/२०१५ व इतर याचिका मध्ये दिनांक ०६ जुलै, २०१७ रोजी दिलेल्या निर्णयान्वये विभागाच्या अधिपत्याखालील विभागीय शिक्षण उपसंचालक, अमरावती कार्यालयाच्या आस्थापनेवर अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र अवैध ठरलेले गट-क मधील २ कर्मचारी व गट-ड मधील २ कर्मचारी अशा खालील एकूण ४ कर्मचाऱ्याकरिता ४ अधिसंख्य पदे ११ महिन्यांसाठी निर्माण करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | कर्मचाऱ्यांचे नाव | पदनाम | गट |
|---|---|---|---|
| १ | श्रीमती सरोज पुंडलिकराव कुंभारे | प्रशासन अधिकारी | क |
| २ | श्री. दिनेश हिम्मतराव बचे | मुख्य लिपीक | क |
| ३ | श्री. राजेश दलपतसिंह नरवैय्या | शिपाई | ड |
| ४ | श्री. रामदास व्ही. इंगळे | शिपाई | ड |

२. अनुसूचित जमातीचे जात वैधता प्रमाणपत्र सादर न केल्याच्या कारणास्तव अधिसंख्य पदावर सेवा वर्ग करण्यात येणाऱ्या अधिकारी व कर्मचांऱ्याना मानवतावादी दृष्टीकोनातून तसेच प्रशासनाची होणारी अडचण दूर करण्यासाठी तात्पुरत्या स्वरुपात ११ महिन्यांकरीता किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते, त्या दिनांकापर्यत यापैकी जे आधी घडेल तोपर्यत अधिसंख्य पदावर नेमणूक देण्यात येत आहे.

३. विभागीय शिक्षण उपसंचालक, अमरावती यांनी सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन दि. २१.१२.२०१९ रोजी शासन निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्ट-क मधील नमुन्यानुसार नियुक्ती आदेश तात्काळ निर्गमित करुन त्यांची सेवा तातडीने अधिसंख्य पदावर वर्ग करावी.

४. सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक २१.१२.२०१९ च्या शासन निर्णयातील सूचना व उक्त परि. ४ मध्ये नमुद अभिप्रायानुसार जात वैधता प्रमाणपत्र अवैध ठरविलेल्या अधिकारी/कर्मचारी यांचेकरिता प्रथमत: अधिसंख्य पदे निर्माण करुन त्या पदांवर सदर कर्मचा-यांच्या सेवा वर्ग कराव्यात, तद्नंतर अधिसंख्य पदे निर्माण करण्याच्या कार्यवाहीस वित्त विभागाच्या अभिप्रायानुसार त्याची मान्यता घेण्यात येईल.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्रमांक २०२००६२९१४५२३०७९२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Santosh Basaveshwar Mamadapure

Digitally signed by Santosh Basaveshwar Mamadapure
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3bfe11165299 6d95372924b1d22cdf88b33dfa2a3de3d8ea011b7d83adc40cb6, serialNumber=557abe7a7194ec5ddc74df537d7d57a9dbda20b1937a2e41983c35f6a38b6ad8, cn=Santosh Basaveshwar Mamadapure
Date: 2020.06.29 15:29:32 +05'30'

**( संतोष ममदापुरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य

२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य
३) मा. मंत्री, शालेय शिक्षण, महाराष्ट्र राज्य
४) मा. राज्यमंत्री, शालेय शिक्षण, महाराष्ट्र राज्य
५) महालेखापाल - १ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०.
६) महालेखापाल - १ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०.
७) महालेखापाल - २ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर
८) महालेखापाल - २ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
९) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) प्रधान सचिव वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
११) आयुक्त (शिक्षण) यांचे कार्यालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१२) सर्व उप शिक्षण संचालक
१३) संबंधित जिल्हा कोषागार कार्यालय,
१४) निवडनस्ती.